आदिवासी विकास विभागांतर्गत
गट "क" व गट "ड"
कर्मचा-यांविरुध्दच्या विभागीय
चौकशी प्रकरणांबाबत

**महाराष्ट्र शासन**
आदिवासी विकास विभाग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
**शासन परिपत्रक क्रमांकः आस्था-२०१०/प्र.क्र.१७६/का-१५,**
दिनांकः २४ सप्टेंबर,२०१०

**वाचा** :- १) शासन पत्र, आदिवासी विकास विभाग, क्रमांक::आस्था-२०१०/प्र.क्र.१७६/का-१५, दिनांक २२ जुलै,२०१०
२) सामान्य प्रशासन विभाग पत्र क्र. विचौ-१००८/प्र.क्र.३०/११-अ, दिनांक २ जुलै,२०१०

**परिपत्रक :-** शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक एसपीओ-२८०४/प्र.क्र.११/२००४/११-अ, दिनांक २६ मे,२००६ तसेच शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग दिनांक २८ ऑक्टोबर,२००९ अन्वये गट "क" व गट "ड" कर्मचा-यांविरुध्द विभागीय चौकशीची प्रकरणे कंत्राटी तत्वावर सेवानिवृत्त चौकशी अधिका-यांकडे सोपविण्याबाबतचे आदेश देण्यात आले आहेत.

२. वरील आदेशाप्रमाणे कार्यवाही करताना कंत्राटी तत्वावरील सेवानिवृत्त चौकशी अधिकारी हे ज्या विभागातून सेवानिवृत्त झाले असतील त्या विभागातील विभागीय चौकशीची प्रकरणे त्यांच्याकडे न सोपविता अन्य विभागातून सेवानिवृत्त झालेल्या सेवानिवृत्त चौकशी अधिका-यांकडे प्रकरणे सोपविण्यात यावीत अशाप्रकारच्या सूचना सामान्य प्रशासन विभागाच्या उपरोक्त संदर्भ क्र. २ वरील पत्रान्वये देण्यात आल्या आहेत व सामान्य प्रशासन विभागाचे सदर पत्र आदिवासी विकास विभागाच्या संबंधीत अधिका-यांना संदर्भ क्र. १ वरील पत्राव्दारे पृष्ठांकित करण्यात आले आहे. तरी देखील विभागातून सेवानिवृत्त झालेल्या कंत्राटी तत्वावरील चौकशी अधिका-यांकडे विभागातील विभागीय चौकशीची प्रकरणे सोपविण्यात येत असल्याचे निदर्शनास आले आहे. यामुळे नैसर्गिक न्यायाच्या तत्वांचे उल्लंघन होत आहे.

३. त्यामुळे विभागाच्या अधिपत्त्याखालील गट क व गट ड ची जी विभागीय चौकशीची प्रकरणे विभागातून सेवानिवृत्त झालेल्या अधिका-यांकडे सोपविली गेली आहेत, अशी सर्व विभागीय चौकशीची प्रकरणे त्यांच्याकडून तात्काळ काढून घेण्यात यावीत व इतर विभागातून सेवानिवृत्त झालेल्या व सामान्य प्रशासन विभागाच्या पॅनलवर असणा-या चौकशी अधिका-यांकडे सोपविण्यात यावीत.

३. विभागाच्या अधिपत्त्याखालील सर्व कार्यालय प्रमुखांनी / शिस्तभंगविषयक प्राधिका-यांनी या परिपत्रकातील वरील सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे. परिपत्रकातील सूचनांचे उल्लंघन केल्याचे निदर्शनास आल्यास संबधीत अधिका-याविरुध्द शिस्तभंग विषयक कारवाई करण्यात येईल.

४. हे परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या अधिकृत संकेतस्थळावर *(www.maharashtra.gov.in)* उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक क्र. **२०१००९२४१९१७०३००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशांनुसार व नांवाने,

( अं. सा. चंद्रनशिवे )
कार्यासन अधिकारी २४/९/२०१०

प्रत,

१) आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
२) आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
३) अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे / नाशिक / नागपूर / अमरावती.
४) सर्व सह आयुक्त, अनुसूचित जमाती प्रमाणपत्र समिती.
५) सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
६) कक्ष अधिकारी (कार्या. क्र.१,११, १३ व १८) आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
७) निवड नस्ती (का-१५) आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.